केबल टेलिव्हिजन नेटवर्क्स(संशोधित) नियम-१९९९.
दूरदर्शन चॅनेल्सच्या प्रक्षेपणाच्या दर्जाबाबत..

महाराष्ट्र शासन
गृह विभाग(विशेष)
शासन परिपत्रक क्रमांक:बीसीआर-५३/२०००/३४/विशा-५
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक: ०७ जुलै, २०००.

**शासन परिपत्रक :-** केबल टेलिव्हिजन नेटवर्क (विनियमन) कायदा-१९९५ च्या कलम ८(१) अन्वये सर्व केबल ऑपरेटर्सना दूरदर्शनची कमीत कमी दोन चॅनेल ही डिश अॅन्टेना किंवा टिव्हीआरओ व्दारा प्रसारित करावी हे बंधनकारक करण्यात आले आहे. तथापि, शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, केबल टी.व्ही.ऑपरेटर हे त्यांच्या नेटवर्कवरुन दूरदर्शनचे चॅनेल्स एकतर दाखवित नाहीत वा दाखवित असलेल्या चॅनेल्सच्या प्रक्षेपणाचा दर्जा हा चांगला नसतो.

वरील त्रुटी लक्षात घेऊन केबलधारकांना चांगल्या प्रकारचे प्रक्षेपण दिसावे या दृष्टीने केंद्रशासनानेकेबल टेलिव्हीजन नेटवर्क्स नियम १९९४ मध्ये दि. २० ऑगस्ट १९९९ व्दारा सुधारणा करुन सुधारित केबल टेलिव्हिजन नेटवर्क(संशोधित) नियम १९९९ हे अस्तित्वात आणले आहेत. त्यानुसार केबल टेलिव्हिजन नेटवर्क नियम १९९४ च्या नियम-६ खाली खालील पोट नियमाचा अंतर्भाव करण्यात येत आहे.

<u>"६अ-उपग्रह स्थापीत मुख्यबँड (प्राईम बॅन्ड) वर स्थानिक संकेतांचा (signals) अडथळा येऊ न देता दूरदर्शन चॅनेल्सचे प्रक्षेपण"</u> उक्त नियमामुळे सर्व केबल ऑपरेटरांना खालील बाबी अनिवार्य करण्यात आल्या आहेत.

<u>प्रत्येक केबल ऑपरेटर:-</u>

अ) आपल्या केबल नेटवर्कवरुन दूरदर्शनच्या कमीत कमी दोन चॅनेल्सचे मुख्य बॅन्ड (प्राईम बॅन्ड) वर स्थानिक प्रसारित चॅनेल्स व्यतिरिक्त वेगळया चॅनेलवर प्रसारण करेल.

ब) आपल्या केबल नेटवर्कवर डिशएन्टीना / टिवीआरओ व्दारा प्रसारणासाठी दूरदर्शन चॅनेल्सच्या उपग्रहाचे संदेश <u>(signals)</u>प्राप्त करेल.यागी अॅन्टीनाव्दारा प्राप्त संदेश ग्रहण करणार नाही.

क) केबल नेटवर्कच्या ज्या बॅन्डवर दूरदर्शन"१ व दूरदर्शन-२ च्या वाहिन्यांचे प्रक्षेपण होत असेल त्या वाहिन्यांवर अन्य कोणत्याही वाहिन्यांचे प्रक्षेपण करणार नाही. ज्या व्दारे दूरदर्शनच्या वाहिन्यांना अडथळा प्राप्त होईल.

या नियमाच्या प्रयोजनासाठी स्पष्टीकरण :-

<u>"मुख्य बॅन्ड (प्राईम बॅन्ड)"</u>विद्युतचुबकीय स्पेक्ट्रम बॅन्ड -I च्या अंतर्गत येणारे चॅनेल (चॅनेल २ ते ४ त्यांची क्षमता ४७ ते ६८ मेगाहर्टस) आणि बॅन्ड-III (चॅनेल ५ ते १२ ज्यांची क्षमता १७४ ते २३० मेगाहर्टसव्दारे) च्या संबंधित आवृत्तीसह जे सर्वसाधारण दूरदर्शन संचावर एड-ऑन युनिट वा विशेष उपयोगाविना उपलब्ध आहेत. ते यामध्ये अंतर्भूत आहेत.

सर्व पोलीस आयुक्त व सर्व जिल्हादंडाधिकारी यांनी वरील परिच्छेदात नमूद केलेल्या सुधारीत नियमांचे सर्व केबल ऑपरेटर्सनी त्यांच्या त्यांच्या कार्यक्षेत्रात कटाक्षाने पालन करण्याबाबत योग्य ते निर्देश देण्यात यावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि. अ. देशपांडे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग(विशेष)

सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस उप आयुक्त,
सर्व जिल्हादंडाधिकारी,
सर्व उपविभागीय दंडाधिकारी.